# अंधार आवडणारं घुबड

मोस्तफा रेहमानदोस्त
भाषांतर : शरद महाबळ
चित्रकार : अलैन बेलहाचे



ज्योत्स्ना प्रकाशन

# अंधार आवडणारं घुबड

मोस्तफा रेहमानदोस्त
भाषांतर : शरद महाबळ
चित्रकार : अलैन बेलहाचे



ज्योत्स्ना प्रकाशन



Originally published as: Zendani Shab
Author: Mostafa Rahmandoust, Illustrator: Alain Bailhache


मराठी आवृत्ती : अंधार आवडणारं घुबड

प्रकाशक : मिलिंद ल. परांजपे, ज्योत्स्ना प्रकाशन

'धवलगिरी', ४३०-३१ शनिवार पेठ, पुणे ४११०३०

मुंबई ऑफिस : मोहन बिल्डिंग, १६२ ज.शंकरशेठ मार्ग, गिरगाव, मुंबई ४००००४

 पहिली आवृत्ती : नोव्हेंबर २००७

मुद्रक : रिच प्रिंटस्, २७२ नारायण पेठ, पुणे ४११०३०

मूल्य रुपये ३०/- ISBN 81-7925-174-4

घुबडाला दिवसापेक्षा रात्र खूप आवडायची. रात्र पडली, म्हणजे त्याला वाटायचं आता आपण साऱ्या जगाचे राजे आहोत. ते इकडेतिकडे उडायचं, आनंदाच्या भरात पंख फडफडायचं आणि सूं सूं वाहणाऱ्या वाऱ्याप्रमाणे शीळही घालायचं.





घुबडाला जेव्हा कळलं की सूर्याची पूजा करणारे प्राणी असतात, त्यांना रात्र आवडत नाही; तेव्हा ते अतिशय चिडलं. त्याला वाटलं एखादा किडा गिळावा तसंच एकेका सूर्यपूजकांना शोधून काढून गट्ट केलं पाहिजे.

उजाडू लागलं की घुबडाला फार खिन्न वाटायचं. ते एका कोपऱ्यात एकटंच जाऊन एखाद्या झाडाच्या फांदीवर बसून विचार करायचं. ते स्वतःशीच म्हणायचं, कायमच रात्र आणि अंधार असला तर किती बरं होईल! रात्रीला का बरं जावं लागतं? काळोख पडून जरा कुठे वेळ जावा, तोवर आलाच सूर्य आणि तो आला की रात्र संपली. ते सोनेरी मोठ्ठं वाटोळं तबक आकाशाच्या मध्यावरून काढून टाकता आलं तर...

एकदा घुबडाला वाटलं, 'आपण पंख झपाझप हलवून अशी भरारी घ्यावी की सूर्याच्याही वर जाऊन बसावं. मग आपल्या धारदार आणि वाकड्या चोचीनं सूर्याला खूप टोची माराव्या, म्हणजे तो आभाळातून पळ काढेल.'

आणि त्याने तेच केलं. एके दिवशी भरपूर खाऊन घेऊन ते अगदी लवकर सकाळी उडत निघालं. पंखाच्या झपाझप भराऱ्या घेत ते जोमानं वर आकाशाकडे निघालं. त्याला सूर्यापर्यंत पोचायचं होतं. पण जसजसं ते वरवर जाऊ लागलं तसा त्याला थकवा जाणवू लागला. सूर्याची धग आणि प्रकाश यांचा ताप वाढत चालला. त्या दिवशी त्याने खूप प्रयत्न केले पण अखेरीस त्याला थकून पृथ्वीवर परतावं लागलं. खाली आल्यावर ते झाडाच्या ढोलीत बसलं. त्याला वाटलं, 'मी त्याला पळवून लावू पाहतोय हे सूर्याला कळलं. म्हणून त्याने आपले किरण आणि उष्णता यांचा माझ्यावर मारा केला. पण मी असा सहजासहजी गप्प बसणार नाही. मी उद्या थोडं कमी खाईन आणि पाणी जास्त पिईन म्हणजे मला दमायला होणार नाही, तहानही लागणार नाही. मग मी सूर्यापर्यंत नक्की पोहोचेन. एकदा मी तिथपर्यंत पोहोचलो की त्याची अशी दुर्दशा करेन की सूर्य लढायचंही विसरून जाईल.'



दुसऱ्या दिवशी सकाळी थोडंसं खाऊन आणि भरपूर पाणी पिऊन घुबडाने उडायला सुरुवात केली. पंख खालीवर करत ते उंचउंच उडत गेलं. पण त्या दिवशीसुद्धा त्याला फार वर जाता आलं नाही. रोज ते असं उडायचं पण अधिकाधिक तहानलेल्या आणि भुकेल्या अवस्थेत आपल्या ढोलीत परत यायचं. मग रात्रीसुद्धा ते इतकं थकून गेलेलं असायचं की उडायची अगर इकडेतिकडे करायची त्याला ताकद राहायची नाही. हे काम आपल्याला एकट्याला जमणार नाही हे आता त्याच्या लक्षात येऊ लागलं.

एके दिवशी सूर्य ढगांआड दडलेला आहे हे पाहून घुबडाला एक नवीन कल्पना सुचली. ते स्वतःशी म्हणालं, 'मला निदान ढगापाशी तरी पोचता आलं पाहिजे! ढगाजवळून उडता उडता मी त्याला म्हणेन, तू सततच आकाशात रहा आणि सूर्याला झाकून टाक. केव्हाही, उन्हापेक्षा ढगाळलेला दिवस केवढा तरी बरा. त्यात आणखी तो ढग गडद काळा असेल तर अधिकच उत्तम.'

मग त्या दिवशी ते ढगाच्या दिशेनं निघालं. जोरजोरानं पंख खालीवर करत ते उंचउंच जात ढगापर्यंत पोचलं.

ढग थंडगार, स्थिर आणि करड्या रंगाचा होता.

घुबडाने शांतपणे ढगावर थोडी विश्रांती घेतली. इतका वेळ उडाल्यामुळे ते अगदी थकून गेलं होतं. आणि मग त्याने रडायला सुरुवात केली. घुबड इतक्या हृदयाला पाझर फुटेल अशा पद्धतीनं रडत होतं की ढगालाही त्याच्याबद्दल सहानुभूती वाटली, आणि त्यालाही रडू आलं. दोघांनी अगदी मन शांत होईतो रडून घेतलं. मग ढगाने घुबडाला विचारलं, 'तुझ्यावर असं कोणतं संकट कोसळलं आहे की तू एवढ्या करुणपणे रडतो आहेस?'

'माझ्या दुःखाचा कोणता भाग मी तुला सांगू? मी या जगात रात्रीच्या अंधाराने संतुष्ट असतो, त्यात आनंद मानत असतो. पण माझं हे सुख सूर्याला पाहवत नाही. काळोख पडल्यावर मी जरा पंख फडफडवून शांत थंड श्वास घेतो तोच सूर्यमहाराज आपले सोनेरी किरण घेऊन येतात आणि सर्वत्र प्रकाश पसरतो.'

'पण जर तुझ्या म्हणण्याप्रमाणे सूर्य उगवलाच नाही, तर?'

घुबडाने ढगाला त्याचं वाक्य पुरं करू न देता म्हटलं, 'मलाही हेच म्हणायचं आहे, आता तू कोणत्याही शंका काढू नकोस. मर्दासारखा माझ्या पाठी उभा रहा आणि मला सूर्यप्रकाश थांबवण्याकरता मदत कर.'

ढग जरा गडबडला नि म्हणाला, 'मला तुला मदत करता आली असती तर आवडलं असतं; पण आम्ही वाऱ्याच्या नियंत्रणाखाली असतो, तेव्हा तू मदतीसाठी त्याच्याकडे जा.'

यावर क्षणभर विचार करून घुबड म्हणालं, 'वारा तर माझा मित्रच आहे. रात्री मी जेव्हा उडतो, तेव्हा माझ्या पंखाखाली तो आधार देतो, त्यामुळेच मला अधिक चांगलं उडता येतं. जर त्याच्या मदतीने सर्व गोष्टी हव्या तशा होणार असतील तर मला काळजी नाही. आजच रात्री मी त्याच्याशी बोलेन.' एवढं बोलून त्याने ढगाचा निरोप घेतला आणि परत आपल्या घरट्याकडे निघाला.

त्या दिवशी घुबड खूप खुशीत होतं, कारण त्याला आता सूर्याशी लढण्याचा एक मार्ग सापडला होता. रात्र पडली तेव्हा वारा वाहू लागण्याची ते वाट पाहत होतं. बसल्या बसल्या त्याच्या मनात विचार आला, 'हे काही वाटतं तितकं सोपं नाही. वारा जर सूर्याचा मित्र असेल तर तो मला मदत करणार नाही. वारा सूर्याचा शत्रू होईल असं काहीतरी मी वाऱ्याला सांगितलं पाहिजे. यात जर मला यश आलं तर वारा ढगाला सतत सूर्यासमोर राहायला लावेल आणि माझी सूर्याच्या प्रकाशापासून सुटका होईल.'

अखेर वारा वाहू लागला, आणि घुबड त्या सोबतच उडू लागलं. वाऱ्याला नमस्कार करून घुबड म्हणालं, 'सूर्य तुझ्यावर फार रागावला आहे असं माझ्या ऐकण्यात आलं. कारण तू ढगांना सूर्याचे किरण थांबवून धरायला सांगतोस.'

वारा म्हणाला, 'ढग माझ्या नियंत्रणाखाली असतात, हे खरं. पण पाऊस पडावा म्हणून मला त्यांना इकडेतिकडे हलवावं लागतं. त्याचा सूर्याशी काहीही संबंध नाही.'

घुबड म्हणालं, 'कोण जाणे बुवा. तू तुला हवं त्याप्रमाणे कर, पण असं काहीतरी माझ्या कानावर आलं खरं! सूर्य तुला आव्हान देणार आहे.'

वारा म्हणाला, 'मला आव्हान? मी ढगांना आहे तसे आहेत तिथे थांबायला सांगेन, मग सूर्याचे किरण थोपवून धरले जातील आणि असले आव्हानाचे विचार त्याच्या डोक्यातून पार पळतील.'

घुबड आपली युक्ती सफल होत असल्याचं पाहून म्हणालं, 'तुला असं करता आलं तर उत्तमच. पण मला नाही वाटत तुझ्यात असं काही करून दाखवण्याची धमक आहे.'

वारा म्हणाला, 'माझी शक्ती काय आहे, हे तुला आता दिसेलच.' एवढे बोलून तो सूं सूं करत जोराने घोंघावत तेथून निघाला.



त्या रात्री घुबडाला शांत झोप लागली. त्याला स्वप्नात दिसलं की आपल्याला खूप मोठे काळेभोर पंख आहेत, आणि आपण त्या पंखांनी सूर्याचं तोंड झाकून टाकलं आहे. आता त्याच्या एकाही किरणाला कुठे जायला वाव राहिलेला नाही.

घुबड सकाळी उठलं तेव्हाही आकाश ढगाळलेलंच होतं, आणि सूर्याचा मागमूस दिसत नव्हता.



असेच काही दिवस गेले. वारा अद्याप सोसाट्यानं वाहत होता आणि सारे छोटे ढग एकत्र करत होता. हळूहळू सूर्य पुरा झाकोळला गेला, त्यामुळे रात्र संपली तरी पृथ्वीवर फारसा प्रकाश पडत नसे. दिवसभर संध्याकाळ झाल्यासारखंच वातावरण राही. सूर्यप्रकाशाअभावी सारी पृथ्वी मलूल झाली. रोपांनी माना टाकल्या, फुलं कोमेजली, पक्षी गाणं विसरले...

जगाला प्रकाशाची गरज असते हे सूर्याला माहीत होतं. त्याला जेव्हा आपल्या मित्रांची दुःखद स्थिती समजली तेव्हा त्याने ढगांवर हल्ला केला. मग मोठी लढाई जुंपली. एकीकडे सूर्य तर दुसरीकडे ढग आणि वारा. सूर्याच्या गर्जना कडाडणाऱ्या विजांच्या रूपात आकाशात पसरल्या. त्याने आपल्या तेजाच्या

तलवारीने ढगांचे तुकडे करायला सुरुवात केली.

ढगांना सूर्याचा तडाखा सोसवेना. त्यांची पुरती पीछेहाट झाली आणि ते रडू लागले. घुबड त्यावेळी एका झाडाच्या फांदीवर बसून प्रकाश आणि अंधाराची झुंज पाहत होतं. तोच धोधो पाऊस सुरू झाला. पाऊस म्हणजे दुसरंतिसरं काही नसून ढगांचं रडणं होतं. भिजू नये म्हणून घुबड उडालं, आणि झपाझप पंख फडफडावत आपल्या ढोलीत पोचलं. तासाभराने ढोलीच्या कोपऱ्यातून त्याने डोकावून पाहिलं, तर त्याच्या डोळ्यांवर प्रखर सूर्यप्रकाशाचा आघात झाला. सूर्य आणि ढग यांच्यामधील लढाई संपली होती आणि आकाशात ढगांचा मागमूसही दिसत नव्हता. वाऱ्यावरील वावटळीचा वावर थांबला होता.

आपला हाही डाव फसला हे पाहून घुबड अतिशय खिन्न झालं.



त्या दिवसापासून घुबड दिवसभर आपल्या ढोलीत झोपून राहतं आणि रात्र पडल्यावर बाहेर पडतं. पहाट होण्याआधी पुन्हा ते आपल्या छोट्या, अंधाऱ्या ढोलीची वाट धरतं.